महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आस्थाप-२०१५/५१७३/प्र.क्र.१२/म-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १७ जून, २०१५.

<u>वाचा -</u>

**१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा दि.०१ जुलै, २००६**

**२) शासन परिपत्रक क्रमांक:- एसआरव्ही २०१४/व्हीआयपी २८४/प्र.क्र.३६२/१२, दि.२६/११/२०१४**

<u>प्रस्तावना -</u>

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा दि.०१ जुलै, २००६ पासून अंमलात आला आहे. सदर अधिनियमातील कलम ६ नुसार बदली करण्याबाबत सक्षम प्राधिकारी घोषित करण्यात आले आहे. तसेच या कलमाच्या परंतुक २ नुसार बदली करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याला, सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे, या कलमाखाली त्यांचे अधिकार त्यांच्या कोणत्याही दुय्यम प्राधिकाऱ्याकडे सोपविता येतील, अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील कलम ६ खालील परंतूक २ व कलम ७ या मधील तरतूदी एकत्रित विचारात घेऊन बदली करण्यास सक्षम प्राधिकाऱ्यांचे बदल्यांचे अधिकार, त्यांच्या कोणत्याही दुय्यम प्राधिकाऱ्यांकडे प्रत्यार्पित करण्याची कार्यवाही त्वरित करण्याचे निर्देश सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकाद्वारे दिले आहेत.

**३. त्यानुसार प्रशासनातील कालापव्यय टाळून, निर्णय प्रक्रियेतील टप्पे कमी होण्याच्या दृष्टीने तसेच गतीमान प्रशासनाच्या दृष्टीने नोंदणी व मुद्रांक विभागातील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांच्या अधिकाराचे विकेंद्रिकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.**

## शासन निर्णय -

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंधक अधिनियमातील कलम ६ मधल्या परंतुकानुसार नोंदणी व मुद्रांक विभागातील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार खालीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>संवर्ग (वेतनश्रेणी व ग्रेड पे सह)</th><th>अधिनियमातील कलम ६ नुसार सक्षम प्राधिकारी</th><th>अधिकाराच्या प्रत्यायोजनानंतर बदली करण्यास सक्षम प्राधिकारी</th></tr>
<tr><td>१.</td><td>नोंदणी उप महानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक<br>(रु.१५६००-३९१०० + ६६००)<br>(राज्यांतर्गत)</td><td rowspan="5">मा.मंत्री (महसूल)</td><td rowspan="5">मा.मंत्री (महसूल)</td></tr>
<tr><td>२.</td><td>सह जिल्हा निबंधक, उच्च श्रेणी<br>(रु.१५६००-३९१००+५४००)</td></tr>
<tr><td>३.</td><td>मुद्रांक जिल्हाधिकारी<br>(रु.१५६००-३९१००+५४००)</td></tr>
<tr><td>४.</td><td>सह जिल्हा निबंधक निम्नश्रेणी<br>(रु.१५६००-३९१००+४६००)</td></tr>
<tr><td>५.</td><td>सह जिल्हा निबंधक, गट-ब आणि मुद्रांक उपअधिक्षक<br>(रु.९३००-३४८००+४३००)<br>(राज्यांतर्गत)</td></tr>
<tr><td>६.</td><td>दुय्यम निबंधक श्रेणी-१, गट-ब (अराजपत्रित) आणि मुद्रांक निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित)<br>(रु.९३००-३४८००+४३००)<br>(राज्यांतर्गत)</td><td rowspan="4">नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक</td><td rowspan="2">नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक</td></tr>
<tr><td>७.</td><td>वरिष्ठ लिपीक आणि पर्यवेक्षक<br>(रु.५२००-२०२००+२१००)<br>(प्रादेशिक विभागांतर्गत)</td></tr>
<tr><td>८.</td><td>कनिष्ठ लिपीक<br>(रु.५२००-२०२००+१९००)<br>(प्रादेशिक विभागांतर्गत (आंतर जिल्हा) )</td><td>नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक</td></tr>
<tr><td>९.</td><td>कनिष्ठ लिपीक<br>रु.५२००-२०२००+१९००)<br>(जिल्हा अंतर्गत)</td><td>जिल्हा निबंधक यांचे मान्यतेने सह जिल्हा निबंधक</td></tr>
</table>

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१८१५२५५९८९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: CN = Dinesh Rohidas Chavan, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.06.18 15:27:46 +05'30'

**दिनेश चव्हाण**
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक
३) अपर मुद्रांक नियंत्रक, मुंबई
४) संबंधित सर्व सह जिल्हा निबंधक
५) संबंधित मुद्रांक जिल्हाधिकारी
६) निवडनस्ती, म-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२